सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य हज समितीस निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हज-२०२०/प्र.क्र.६३/का-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक:-** १३ ऑगस्ट, २०२०.

संदर्भ:-१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः - अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२०.
२.शासन निर्णय, क्रमांकः - अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ४ मे, २०२०.

प्रस्तावना:-

वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील शासन परिपत्रकान्वये सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल ते जून, २०२० या ३ महिन्याच्या कालावधीसाठी आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा अर्थसंकल्पित निधी *"अर्थसंकल्पिय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स)"* वर मंत्रालय विभागांना वितरीत करण्यात आला आहे. तथापि, वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये कोविड-१९ या संसर्गजन्य आजारामुळे सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात होणाऱ्या अर्थव्यवस्थेवरील परिणामाबाबत विविध उपाययोजना सुचविण्यात आल्या आहेत. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी *"मागणी क्र. झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०२) समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, (०१) (१८) यात्रेकरुंचा खर्च (अनिवार्य), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर), (२२३५ ए २६७)"* या लेखाशीर्षाखाली या विभागास रू.१,७६,५०,०००/- इतका निधी अर्थसंकल्पित असून, माहे एप्रिल २०२० ते सप्टेंबर, २०२० या ६ महिन्याच्या कालावधीकरिता सदर अर्थसंकल्पित रक्कमेपैकी वितरणासाठी उपलब्ध असलेला ५% निधी महाराष्ट्र राज्य हज समितीस वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय:-

या विभागास *"मागणी क्र. झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०२) समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, (०१) (१८) यात्रेकरुंचा खर्च (अनिवार्य), ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर), (२२३५ ए २६७)"* या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पित निधी रू.१,७६,५०,०००/- पैकी माहे एप्रिल, २०२० ते सप्टेंबर, २०२० या ६ महिन्याच्या कालावधीकरिता वितरणासाठी उपलब्ध असलेला ५% निधी महाराष्ट्र राज्य हज समितीस खालीलप्रमाणे वितरित करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | लेखाशीर्ष | कालावधी | ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) |
|---|---|---|---|
| १ | मागणी क्र. झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०२) समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, (०१) (१८) यात्रेकरुंचा खर्च (अनिवार्य), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर), (२२३५ ए २६७)" | एप्रिल २०२० ते सप्टेंबर, २०२० | रु.८.८२ लक्ष |
| | एकूण | | रु.८.८२ लक्ष |

२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० अनुसार महाराष्ट्र राज्य हज समितीस सन २०१९-२० या आर्थिक वर्षात वितरित केलेल्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास प्राप्त झाली आहेत.

३. माहे एप्रिल ते सप्टेंबर, २०२० या कालावधीकरिता उक्त विवरणात नमूद केल्यानुसार *“मागणी क्र. झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०२) समाज कल्याण २०० ,इतर कार्यक्रम, (०१) (१८) यात्रेकरुंचा खर्च (अनिवार्य), ३१ सहायक अनुदान (वेतनत्तर), (२२३५ ए २६७)”* या उद्देशाकरिता कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती यांना मंजूर/वितरित करण्यात येत आहे. उक्त तरतूदीऐवढा खर्च मर्यादित ठेवणेबाबत सक्षम प्राधिकाऱ्याने आवश्यक ती दक्षता घ्यावी.

४. हे आदेश प्रशासकीय विभागांना वित्त विभागाचे शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः- अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.९९९/२०२०/व्यय-१, दि. १३/०७/२०२० अनुसार प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेताक **२०२००८१३१६५८५५८२१४** असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2fde30534317da1ea9bdb3e7bec3c1084d5d608a86e993f8ac0fa02331b77751, serialNumber=b469b3fd61b5201f03b702c0f7fd0ec5cf18beb12425455f4856f44e3d4da763, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2020.08.17 14:01:37 +05'30'

**(सं. छ. तडवी)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, रूम नं.६, तळमजला, साबू सिद्दिकी, मुसाफिरखाना, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.

**प्रति,**

१. महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),मुंबई/नागपूर, महाराष्ट्र राज्य.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३. अवर सचिव (व्यय-४/अर्थ-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. उप सचिव (का-५/का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. निवडनस्ती (का-५).